महाराष्ट्र नागरी सेवा (निवृत्तीवेतन) नियम १९८२ मध्ये सुधारणा करण्याबाबत

दिनांक १ जानेवारी, २००६ नंतरच्या निवृत्तीवेतनधारकांच्या निवृत्तीवेतनात / कुटुंबनिवृत्तीवेतनात सुधारणा

**महाराष्ट्र शासन**
**वित्त विभाग**

शासन निर्णय क्रमांक : सेनिवे १००९/प्र.क्र.३३/सेवा-४
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.दिनांक :३० ऑक्टोबर, २००९

**संदर्भ :-** १) शासन निर्णय, वित्त विभाग क्रमांक : सेनिवे १००८/प्र.क्र.९९/सेवा-४,दिनांक २७ ऑक्टोबर, २००८
२) शासन निर्णय, वित्त विभाग क्रमांक : वेपुर १२०९/प्र.क्र.२०/सेवा-९,दिनांक २७ फेब्रुवारी, २००९.
३) शासन निर्णय, वित्त विभाग क्रमांक : सेनिवे १००९/प्र.क्र.२९/सेवा-४,दिनांक ५ मे, २००९.
४) शासन शुध्दीपत्रक,वित्त विभाग, क्रमांक :सेनिवे १००९/प्र. क्र.२९/सेवा ४, दिनांक २२ जून २००९
५) शासन निर्णय ,वित्त विभाग, क्रमांक :सेनिवे १००९/प्र. क्र.३३/सेवा ४,दिनांक २२ जून २००९
६) शासन शुध्दीपत्रक,वित्त विभाग, क्रमांक :सेनिवे १००९/प्र. क्र.२९/सेवा ४, दिनांक ७ जुलै २००९

## शासन निर्णय

केंद्र शासनाच्या सहाव्या केंद्रिय वेतन आयोगाच्या शिफारशीच्या आधारे राज्य शासकीय कर्मचाऱ्यांच्या निवृत्तीवेतनामध्ये सुधारणा करण्यासाठी श्री. पी. एम. ए.हकीम यांच्या अध्यक्षतेखाली "राज्य वेतन सुधारणा समिती, २००८" स्थापन केली होती. या समितीने केलेल्या शिफारशींच्या अनुषंगाने संदर्भाधिन क्रमांक (२) वरील दिनांक २७ फेब्रुवारी, २००९ च्या शासन निर्णयान्वये निवृत्तीवेतन धारकांच्या निवृत्तीवेतनामध्ये सुधारणा करण्यांचा निर्णय घेण्यात आला आहे. त्याअनुषंगाने निर्गमित केलेला संदर्भाधिन क्र.५ वरील शासन निर्णय, वित्त विभाग, क्रमांक :सेनिवे १००९/प्र. क्र.३३/सेवा ४ दिनांक २२ जून २००९ अधिक्रमित करुन, शासनाने महाराष्ट्र नागरी सेवा (निवृत्तीवेतन) नियम, १९८२ मधील निवृत्तीवेतन, निवृत्ती/मृत्यु उपदान आणि कुटुंब निवृत्तीवेतन नियमित करणा-या नियमांमध्ये खालीलप्रमाणे सुधारणा करण्याचा निर्णय घेतला असून हे फेरबदल राज्य शासकीय कर्मचारी तसेच उपरोल्लेखित नियम ज्यांना लागू आहेत अशा इतर कर्मचा-यांनाही लागू राहतील.

**अंमलबजावणीचा दिनांक -**

२. या आदेशान्वये सुधारित केलेल्या तरतूदी दिनांक १ जानेवारी, २००६ रोजी किंवा त्यानंतर निवृत्त होणाऱ्या /सेवेत असताना मृत्यु पावलेल्या शासकीय कर्मचाऱ्यांना लागू होतील. दिनांक १ जानेवारी, २००६ पूर्वी निवृत्त झालेल्या कर्मचाऱ्यांच्या संदर्भात संदर्भाधिन क्रमांक (३) वरील शासन निर्णय दिनांक ५ मे, २००९ अन्वये स्वतंत्रपणे निर्गमित करण्यात आला आहे.

३. दिनांक १ जानेवारी, २००६ रोजी किंवा त्यानंतर सेवानिवृत्त/मृत झालेल्या/होणाऱ्या ज्या प्रकरणी निवृत्तीवेतन/कुटुंबनिवृत्तीवेतन/उपदान/निवृत्तीवेतनाचे अंशराशीकरण यापूर्वीच प्राधिकृत करण्यात आले आहेत किंवा अद्यापि प्राधिकृत करावयाचे आहेत अशा प्रकरणी ते या आदेशानुसार सुधारित करण्यात येईल. तथापि ज्या प्रकरणात सुधारणापूर्व आदेशानुसार प्राधिकृत झालेले निवृत्तीवेतन हे, या आदेशानुसार देय होणा-या निवृत्तीवेतनापेक्षा अधिक फायदेशीर असेल त्या प्रकरणी महाराष्ट्र नागरी सेवा (निवृत्तीवेतन) नियम १९८२ मधील नियम १३१ लक्षात घेऊन , निवृत्तीवेतनधारकास गैरफायदेशीर होईल अशा प्रकारे आधीच प्राधिकृत झालेल्या निवृत्तीवेतनात सुधारणा करण्यात येणार नाही.

**वेतन -**

४. निवृत्तीवेतन विषयक विविध लाभांच्या परिगणनेसाठी सुधारित वेतन संरचनेत "मुळ वेतन" या संज्ञेचा अर्थ म्हणजे शासकीय कर्मचारी त्याच्या निवृत्तीपूर्वी/मृत्युच्या लगतच्या दिनांकापूर्वी सहाव्या वेतन आयोगानुसार विहीत पे बँड मध्ये आहरित करित असलेले वेतन + अनुज्ञेय ग्रेड वेतन असा राहिल. परंतु त्यामध्ये विशेष वेतनाचा समावेश नसेल.

**निवृत्तीवेतन -**

५ महाराष्ट्र नागरी सेवा (निवृत्तीवेतन) नियम १९८२ नुसार दहा वर्षांची अर्हताकारी सेवा पूर्ण होण्यापूर्वी सेवानिवृत्त होणा-या कर्मचा-यास निवृत्तीवेतन देय नाही. परंतु अशा प्रकरणात महाराष्ट्र नागरी सेवा (निवृत्तीवेतन) नियम १९८२ मधील नियम ११०(१) नुसार सेवेच्या प्रमाणात सेवा उपदान देय ठरेल. अशा प्रकरणात सेवानिवृत्त होणा-या कर्मचा-यांना देय असलेल्या निवृत्तीविषयक लाभाचा खुलासा **जोडपत्र १** मध्ये नमूद करण्यात आला आहे.

५.१ महाराष्ट्र नागरी सेवा (निवृत्तीवेतन) नियम १९८२ मधील नियम ११० (२) (बी) नुसार दिनांक २७ फेब्रुवारी २००९ पासून ( हकीम समितीच्या शिफारशी स्विकारल्याच्या दिनांकापासून) दहा वर्षे किंवा त्यापेक्षा जास्त परंतु वीस वर्षापेक्षा कमी एवढी अर्हताकारी सेवा पूर्ण केल्यानंतर नियतवयोमान, पूर्ण सेवा, रुग्णता किंवा भरपाई निवृत्तीवेतनावर सेवानिवृत्त होणा-या शासकीय कर्मचा-यास त्याने सेवानिवृत्तीच्या शेवटच्या १० महिन्यात अर्जित केलेल्या सरासरी मूळ वेतनाच्या ५०% किंवा शेवटच्या महिन्यात घेतलेल्या मूळ वेतनाच्या ५०% यापैकी जी रक्कम त्याला लाभदायक ठरेल, ती रक्कम निवृत्तीवेतन म्हणून अनुज्ञेय होईल. त्यामुळे महाराष्ट्र नागरी सेवा (निवृत्तीवेतन) नियम १९८२ मधील नियम ११० (२) (बी) ची तरतुद दिनांक २७ फेब्रुवारी २००९ पासून वगळण्यात आली आहे. अशा प्रकरणात सेवानिवृत्त होणा-या कर्मचा-यांना देय असलेल्या निवृत्तीविषयक लाभाचा खुलासा **जोडपत्र २** मध्ये नमूद करण्यात आला आहे. या अनुषंगाने महाराष्ट्र नागरी सेवा (निवृत्तीवेतन) नियम १९८२ मधील नियम ११० (२) (बी) हा त्या मर्यादेपर्यंत सुधारण्यात आला आहे.

५.२ महाराष्ट्र नागरी सेवा (निवृत्तीवेतन) नियम १९८२ मधील नियम ११०(२) (ए) नुसार पूर्ण निवृत्तीवेतनासाठी दिनांक २७ फेब्रुवारी २००९ पासून ( हकीम समितीच्या शिफारशी स्विकारल्याच्या दिनांकापासून) ३३ वर्षाच्या किमान अर्हताकारी

सेवेची आवश्यकता नसून शासकीय कर्मचा-याने २० वर्षाची किमान अर्हताकारी सेवा पूर्ण केल्यानंतर सेवानिवृत्तीच्या शेवटच्या १० महिन्यात अर्जित केलेल्या सरासरी मूळ वेतनाच्या ५०% किंवा शेवटच्या महिन्यात घेतलेल्या मूळ वेतनाच्या ५०% यापैकी जी रक्कम त्याला लाभदायक ठरेल, ती रक्कम निवृत्तीवेतन म्हणून अनुज्ञेय होईल. त्यामुळे महाराष्ट्र नागरी सेवा (निवृत्तीवेतन) नियम १९८२ मधील नियम ११० (२) (ए) ची तरतुद दिनांक २७ फेब्रुवारी २००९ पासून वगळण्यात आली आहे. अशा प्रकरणात सेवानिवृत्त होणा-या कर्मचा-यांना देय असलेल्या निवृत्तीविषयक लाभाचा खुलासा **जोडपत्र ३** मध्ये नमूद करण्यात आला आहे. या अनुषंगाने महाराष्ट्र नागरी सेवा (निवृत्तीवेतन) नियम १९८२ मधील नियम ११० (२) (ए) हा त्या मर्यादेपर्यंत सुधारण्यात आला आहे.

**५.३** दिनांक २७ फेब्रुवारी २००९ पासून अर्हताकारी सेवेचा किमान कालावधी २० वर्षे इतका करण्यात आल्यामुळे महाराष्ट्र नागरी सेवा (निवृत्तीवेतन) नियम १९८२ मधील नियम ६६ (ए) )नुसार अर्हताकारी सेवेत भर घालण्याची तरतुद दिनांक २७ फेब्रुवारी २००९ पासून रद्द करण्यात येत आहे. या अनुषंगाने महाराष्ट्र नागरी सेवा (निवृत्तीवेतन) नियम १९८२ मधील नियम ६६ (ए) ) हा त्या मर्यादेपर्यंत सुधारण्यात आला आहे.

**५.४** परिच्छेद ५.१, ५.२ व ५.३ मधील तरतुदी दिनांक २७ फेब्रुवारी २००९ पासून अस्तित्वात येतील व या दिनांकास किंवा त्यानंतर सेवानिवृत्त होणा-या कर्मचा-यांना त्या लागु होतील. दिनांक १ जानेवारी, २००६ रोजी किंवा त्यानंतर परंतु दिनांक २७ फेब्रुवारी २००९ पूर्वी सेवानिवृत्त झालेल्या कर्मचा-यांना त्यावेळी अस्तित्वात असलेले नियम/आदेश लागु राहतील.

**५.५** सुधारित वेतनश्रेणीसाठी विकल्प दिलेल्या व सुधारित वेतनश्रेणी दिनांक १ जानेवारी, २००६ पासून लागू झाल्यानंतर १० महिन्यांच्या आत सेवानिवृत्त झालेल्या शासकीय कर्मचा-यांच्या प्रकरणी निवृत्तीपूर्वीच्या १० महिन्यांच्या कालावधीसाठी निवृत्तीवेतनार्ह वेतन खालील तरतुदींनुसार निश्चित करण्यात यावे :

**अ) सुधारित वेतनश्रेणीत वेतन घेतलेल्या कालावधीसाठी -** ज्या महिन्यात सुधारित वेतनश्रेणीत वेतन काढण्यात आलेले होते, त्या महिन्यांचे एकूण मूळ वेतन ;

**आणि**

**ब) असुधारित वेतनश्रेणीत वेतन घेतलेल्या कालावधीसाठी -** ज्या महिन्यात असुधारित वेतनश्रेणीत वेतन काढण्यात आलेले होते, त्या महिन्यांचे एकूण वेतन खालील बाबी विचारात घेऊन परिगणित करण्यात येईल -

१) मूळ वेतन (मधल्या कालावधीत वेतनवाढ काढण्यात आलेली असल्यास ती अंतर्भूत करुन) + महागाई वेतन + संबंधित कालावधीत काढलेल्या मुळ वेतनाशी समुचित असा दिनांक १ जानेवारी, २००६ रोजीच्या दराने असलेला उचित महागाई भत्ता.

२) असुधारित वेतनश्रेणीतील मूळ वेतनाच्या ४० टक्के या दराने मूळ वेतनावरील काल्पनिक वाढ

वरिलप्रमाणे निवृत्तीपूर्वीच्या १० महिन्यांचे निवृत्तीवेतनार्ह वेतन, (अ) व (ब) यांची बेरीज करुन आणि त्या बेरजेस दहाने भागून परिगणित करावे. अशा प्रकरणात निवृत्तीच्या दिनांकास अस्तित्वात असलेल्या नियमानुसार निवृत्तीवेतन अनुज्ञेय होईल.

**५.६** निवृत्तीवेतनाची कमाल मर्यादा राज्य शासनाकडील उच्चतम अनुज्ञेय वेतनाच्या ५० टक्के अशी राहील. (उच्चतम वेतन दिनांक १.१.२००६ पासून रुपये ६७,०००/- + संबंधित पदास अनुज्ञेय ग्रेड वेतन असे आहे.)

**निवृत्ती उपदान/मृत्यु उपदान -**

**६.** या शासन निर्णयाच्या परि.४ मध्ये नमूद केलेल्या मूळ वेतनावर निवृत्ती/मृत्यु उपदानाची परिगणना करण्यात येईल. दिनांक ३१ ऑगस्ट,२००९ पर्यंत सेवानिवृत्त झालेल्या कर्मचा-यांना त्यांच्या अर्हताकारी सेवेच्या प्रत्येक पूर्ण सहामाही कालावधीकरिता त्याच्या मुळ वेतनाच्या एक चतुर्थांश (कमाल साडेसोळा पट) किंवा रुपये पाच लाख यापैकी जी रक्कम कमी असेल इतके निवृत्ती उपदान अनुज्ञेय राहील. दिनांक १ सप्टेंबर,२००९ रोजी किंवा त्यानंतर सेवानिवृत्त झालेल्या कर्मचा-यांकरिता त्यांच्या अर्हताकारी सेवेच्या प्रत्येक पूर्ण सहामाही कालावधीकरिता त्यांच्या मुळ वेतनाच्या एक चतुर्थांश (कमाल साडेसोळा पट) किंवा रुपये सात लाख यापैकी जी रक्कम कमी असेल इतके निवृत्ती उपदान अनुज्ञेय राहील.

**६.१** दिनांक ३१ ऑगस्ट,२००९ पर्यंत सेवेत असताना शासकीय कर्मचा-याचे निधन झाल्यास, त्याच्या कुटुंबाला महाराष्ट्र नागरी सेवा (निवृत्तीवेतन) नियम १९८२ मधील नियम १११ (२) मध्ये नमूद केलेल्या दराने किंवा रुपये पाच लाख यापैकी जी रक्कम कमी असेल इतके मृत्यु-उपदान अनुज्ञेय राहील. दिनांक १ सप्टेंबर,२००९ रोजी किंवा त्यानंतर सेवेत असताना शासकीय कर्मचा-याचे निधन झाल्यास त्याच्या कुटुंबाला महाराष्ट्र नागरी सेवा (निवृत्तीवेतन) नियम १९८२ मधील नियम १११ (२) मध्ये नमूद केलेल्या दराने किंवा रुपये सात लाख यापैकी जी रक्कम कमी असेल इतके मृत्यु-उपदान अनुज्ञेय राहील.

**कुटुंब निवृत्तीवेतन १९६४**

**७.** कुटुंब निवृत्तीवेतनाची परिगणना मूळ वेतनाच्या ३० टक्के अशा एकरुप दराने काढण्यात येईल व या कुटुंब निवृत्तीवेतनाची कमाल मर्यादा राज्य शासनाकडील उच्चतम अनुज्ञेय वेतनाच्या ३० टक्के अशी राहील. ( उच्चतम वेतन दिनांक १.१.२००६ पासून रुपये ६७,०००/- + संबंधित पदास अनुज्ञेय ग्रेड वेतन असे आहे.)

**७.१** सेवेत असताना मृत्यु पावलेल्या शासकीय कर्मचा-यांच्या वारसांना महाराष्ट्र नागरी सेवा (निवृत्तीवेतन) नियम १९८२ मधील नियम ११६ (४) (ए) (एक) मधील तरतुदींच्या अधिन दिनांक १ जानेवारी,२००६ पासून संबंधित कर्मचा-याच्या मृत्युच्या दिनांकानंतरच्या दिनांकापासून १० वर्षापर्यंत उच्च दराने निवृत्तीवेतन मिळेल. याकरिता असलेली वयाची अट रद्द करण्यात येत आहे. या अनुषंगाने म.ना.से. (निवृत्तिवेतन) नियम १९८२ मधील नियम ११६ (४) (ए) (एक) हा त्या मर्यादेपर्यंत सुधारण्यात आला आहे.

**७.२** शासकीय कर्मचा-याचा मृत्यु सेवानिवृत्तीनंतर झाल्यास त्याच्या वारसांना उच्च दराने निवृत्तीवेतन देण्याच्या कालावधीबाबत म.ना.से. (निवृत्तिवेतन) नियम १९८२ मधील नियम ११६ (४) (ए) (दोन) मध्ये असलेल्या तरतुदींमध्ये कोणताही बदल करण्यात आलेला नाही.

**<u>निवृत्तीवेतनाचे अंशराशीकरण -</u>**

**८** म.ना.से. (निवृत्तिवेतनाचे अंशराशीकरण) नियम १९८४ मधील नियम ५ (१) नुसार दिनांक २७फेब्रुवारी,२००९ पासून शासकीय कर्मचा-याला, त्याच्या निवृत्तीवेतनाच्या ४०% यापेक्षा अधिक होणार नाही एवढ्या भागाचे, एका ठोक रकमेतील प्रदानासाठी **जोडपत्र ४** मध्ये दिलेल्या दरानुसार अंशराशीकरण करता येईल. या अनुषंगाने म.ना.से. (निवृत्तिवेतनाचे अंशराशीकरण) नियम १९८४ मधील नियम ५(१) व तक्ता हा त्या मर्यादेपर्यंत सुधारण्यात आला आहे.

**८.१** म.ना.से. (निवृत्तिवेतनाचे अंशराशीकरण) नियम १९८४ मधील नियम ५(१) व निवृत्तीवेतनाच्या अंशराशीकरण मुल्याबाबत दिलेला तक्ता बदलण्यात आला असून हा नियम व सध्या अस्तित्वात असलेला तक्ता यापुढे अंमलात राहणार नाही. सुधारित तक्ता दिनांक २७ फेब्रुवारी २००९ पासून अस्तित्वात येईल व या दिनांकास किंवा त्यानंतर सेवानिवृत्त होणा-या कर्मचा-यांना तो लागु होईल. या करिता अंशराशीकरणाचे सुत्र पुढीलप्रमाणे आहे :

**मुळ निवृत्तीवेतन x ४०% x १२ x अंशराशीकरणाच्या सुधारित तक्त्यानुसार (जोडपत्र-४) कर्मचा-याच्या मुळ अर्जाच्या दिनांकाच्या पुढील जन्मदिनी होणा-या वयाकरिता निश्चीत केलेले अंशराशीकृत मुल्य**

**८.२** जे कर्मचारी दिनांक १ जानेवारी,२००६ ते दिनांक २६ फेब्रुवारी २००९ पर्यंत सेवानिवृत्त झाले आहेत, त्यांना त्यांच्या असुधारित वेतन/निवृत्तीवेतनावर पूर्वीच्या दराने अंशराशीकरणाचा लाभ देय ठरेल. अशा निवृत्तीवेतनधारकांना त्यांचे मुळ निवृत्तीवेतन सहाव्या वेतन आयोगानुसार सुधारित झाल्यामुळे वाढीव मुळ निवृत्तीवेतनाचे अंशराशीकरण करावयाचे असल्यास खालील दोन पर्यायांपैकी एका पर्यायाचा लेखी विकल्प देण्याची परवानगी देण्यात येत आहे. एकदा दिलेला विकल्प अंतिम असेल.

अ) नवीन अंशराशीकरण न करता सुधारित मुळ निवृत्तीवेतन वजा यापूर्वी असुधारित निवृत्तीवेतनावर अंशराशीकरण केलेली रक्कम एवढे निवृत्तीवेतन घेणे.

**<u>किंवा</u>**

ब) वाढीव मुळ निवृत्तीवेतनापैकी ( सुधारित मुळ निवृत्तीवेतन वजा पूर्वीचे मुळ निवृत्तीवेतन) पुन्हा १/३ रकमेचे अंशराशीकरण सुधारित तक्त्यात निश्चीत केलेल्या दरानुसार करणे.

असे करण्याचा विकल्प देते वेळी मुळ अर्जाच्या दिनांकास कर्मचा-याचे जे वय असेल त्याच्या पुढील जन्मदिनी होणा-या वयाकरिता खालील सुत्रानुसार अंशराशीकृत मुल्य त्याला देय ठरेल :

**मुळ निवृत्तीवेतन x १/३ x १२ x अंशराशीकरणाच्या सुधारित तक्त्यानुसार (जोडपत्र-४) कर्मचा-याच्या मुळ अर्जाच्या दिनांकाच्या पुढील जन्मदिनी होणा-या वयाकरिता निश्चीत केलेले अंशराशीकृत मुल्य**

एच-१८१५[१००००+४०-१०-०९]-३

उपरोक्त ब येथील विकल्पानुसार निवृत्तीवेतनधारकास सुधारित मुळ निवृत्तीवेतन वजा एकूण अंशराशीकरण (पूर्वी केलेले अंशराशीकरण + सुधारित व असुधारित निवृत्तीवेतनातील फरकावर केलेले अंशराशीकरण) एवढे मासिक निवृत्तीवेतन देय ठरेल. तसेच निवृत्तीवेतनधारकाच्या सेवानिवृत्तीच्या दिनांकापासून दुसरे अंशराशीकरण करुन त्याची ठोक रक्कम मिळेपर्यंत त्याला सुधारित मुळ निवृत्तीवेतन वजा पूर्वी केलेले अंशराशीकरण वजा प्रत्येक महिन्यात घेतलेले मासिक निवृत्तीवेतन याप्रमाणे थकबाकी देय ठरेल.

**८.३** परिच्छेद ८ व ८.१ मधील तरतुदी दिनांक २७ फेब्रुवारी २००९ पासून अस्तित्वात येतील व या दिनांकास किंवा त्यानंतर सेवानिवृत्त होणा-या कर्मचा-यांना त्या लागु होतील. दिनांक १ जानेवारी, २००६ रोजी किंवा त्यानंतर परंतु दिनांक २७ फेब्रुवारी २००९ पूर्वी सेवानिवृत्त झालेल्या कर्मचा-यांना त्यावेळी अस्तित्वात असलेल्या तरतुदी लागु राहतील.

**८.४** सुधारित निवृत्तीवेतनाच्या अंशराशीकृत मुल्याच्या थकबाकीची रक्कम ज्या दिनांकास प्रत्यक्षात प्रदान करण्यात आली असेल / येईल, त्या दिनांकापासून मासिक निवृत्तीवेतनातून अंशराशीकरणाचा सुधारित भाग कमी करण्यात यावा. याबाबतचा सविस्तर तपशील विभाग/कार्यालय प्रमुखांनी संबंधित कोषागार अधिका-यांना कळविणे बंधनकारक आहे.

**८.५** शासन निर्णय, वित्त विभाग, क्रमांक निअंक-१०८६/१७७१/सेवा-४, दिनांक ३० मे १९८८ च्या तरतुदींनुसार सुधारित निवृत्तीवेतनाच्या अंशराशीकृत भागाचे १५ वर्षानंतर पुनःस्थापन करताना ज्या दिनांकापासून सुधारित अंशराशीकृत भाग मासिक निवृत्तीवेतनातून कमी करण्यात आलेला असेल त्या दिनांकापासून १५ वर्षानंतर तो पुनःस्थापित करण्यात येईल.

**<u>महागाई वाढ</u>**

**९.** राज्य शासकीय निवृत्तीवेतनधारक व कुटुंबनिवृत्तीवेतनधारकांना या आदेशानुसार अनुज्ञेय होणा-या निवृत्तीवेतन/कुटुंबनिवृत्तीवेतनावर दिनांक १ जानेवारी,२००६ पासून खाली दर्शविलेल्या दराने महागाई वाढ देण्यात येईल.

| अनु.क्र | कालावधी | महागाई वाढीचा मासिक दर |
|---|---|---|
| १ | दिनांक१ जानेवारी २००६ ते दिनांक ३० जुन २००६ पर्यंत | निवृत्तीवेतन/कुटुंब निवृत्तीवेतनाच्या ०% |
| २ | दिनांक १ जुलै २००६ ते दिनांक ३१ डिसेंबर २००६ पर्यंत | निवृत्तीवेतन/कुटुंब निवृत्तीवेतनाच्या २% |
| ३ | दिनांक जानेवारी २००७ ते दिनांक ३० जुन २००७पर्यंत | निवृत्तीवेतन/कुटुंब निवृत्तीवेतनाच्या ६% |
| ४ | दिनांक १ जुलै २००७ ते दिनांक ३१ डिसेंबर २००७ पर्यंत | निवृत्तीवेतन/कुटुंब निवृत्तीवेतनाच्या ९% |
| ५ | दिनांक १ जानेवारी २००८ ते दिनांक ३० जुन २००८पर्यंत | निवृत्तीवेतन/कुटुंब निवृत्तीवेतनाच्या १२% |
| ६ | दिनांक १ जुलै २००८ ते दिनांक ३१ डिसेंबर २००८ पर्यंत | निवृत्तीवेतन/कुटुंब निवृत्तीवेतनाच्या १६% |

दिनांक १ जानेवारी २००९ पासून निवृत्तीवेतन/कुटुंब निवृत्तीवेतनाच्या २२% तर दिनांक १ जुलै,२००९ पासून निवृत्तीवेतन/कुटुंब निवृत्तीवेतनाच्या २७% महागाई भत्ता देण्याचे आदेश अनुक्रमे शासन निर्णय ,वित्त विभाग, क्रमांक :निमवा-१००९/३५/सेवा ४ दिनांक ५ मे, २००९ व शासन निर्णय ,वित्त विभाग, क्रमांक :निमवा-१००९/प्र.क्र.८३/सेवा ४ दिनांक ७ ऑक्टोबर, २००९ अन्वये निर्गमित करण्यात आले आहेत.

१०. सुधारित वेतन संरचनेनुसार निवृत्तिवेतन/कुटुंब निवृत्तीवेतन दिनांक १ एप्रिल,२००९ पासून रोखीने अदा करण्यात यावे. दिनांक १ जानेवारी, २००६ ते दिनांक ३१ मार्च, २००९ पर्यंतच्या कालावधीतील थकबाकी शासन निर्णय, वित्त विभाग क्र. सेनिवे १००८/प्र.क्र.९९/सेवा-४, दि. २७ ऑक्टोबर २००८ अन्वये मंजूर केलेल्या अग्रिमाची रक्कम प्रथम हप्त्यात समायोजित करुन ५ वर्षात ५ समान हप्त्यात रोखीने अदा करण्यात यावी. सन २००९ मध्ये अदा करावयाच्या प्रथम हप्त्याच्या थकबाकीची रक्कम असल्यास व ती अद्याप अदा करण्यात आली नसल्यास ती डिसेंबर,२००९ पर्यंत अदा करावी. थकबाकीची उर्वरित रक्कम सन २०१० पासून दरवर्षी जुन महिन्यात अदा करावी.

१०.१ निवृत्तीवेतन सुधारित झाल्यामुळे देय ठरणा-या अंशराशीकरण व उपदानाच्या थकबाकीची रक्कम एक रकमी रोखीने अदा करण्यात यावी.

**११. दिनांक १.१.२००६ रोजी किंवा त्यानंतर निवृत्त झालेल्या होणा-या/सेवेत असताना मृत्यु पावलेल्या राज्य शासकीय कर्मचाऱ्यांच्या बाबतीत निवृत्तिवेतनविषयक लाभांचे निर्धारण व प्राधिकृती याबाबत महाराष्ट्र नागरी सेवा (निवृत्तिवेतन) नियम, १९८२ आणि महाराष्ट्र नागरी सेवा (निवृत्तिवेतनाचे अंशराशीकरण) नियम, १९८४ मध्ये विहित केलेली नेहमीची कार्यपध्दती अवलंबिण्यात यावी.**

१२. ज्या निवृत्तीवेतनधारक/कुटुंब निवृत्तीवेतनधारकांना असुधारित वेतनावर आधारित तात्पुरते निवृत्तीवेतन/कुटुंबनिवृत्तीवेतन विषयक लाभ, यथास्थिती, महाराष्ट्र नागरी सेवा (निवृत्तीवेतन) नियम १९८२ च्या नियम १२६, १३० व नियम १४० च्या तरतुदीनुसार मंजूर करण्यात आलेले आहेत, त्यांचे तात्पुरते निवृत्तीवेतन/कुटुंबनिवृत्तीवेतन विषयक लाभही वरील आदेशांनुसार तात्पुरत्या स्वरुपात सुधारित करण्यात यावेत.

१३. निवृत्तीवेतनधारक/कुटुंबनिवृत्तीवेतनधारकाच्या कायदेशीर वारसदारास (वारसदारांना) दिनांक १ जानेवारी, २००६ पासून निवृत्तीवेतनधारक/कुटुंब निवृत्तीवेतनधारक यांच्या मृत्युच्या दिनांकापर्यंतची हयातकालिन थकबाकी मिळण्याचा हक्क असेल. या प्रयोजनासाठी कायदेशीर वारसदाराने शासकीय कर्मचारी जेथून सेवानिवृत्त झाला असेल किंवा त्याच्या मृत्युपूर्वी शेवटी जेथे कार्यरत होता त्या विभाग/कार्यालय प्रमुखाकडे अर्ज करावा.

**१४. महाराष्ट्र नागरी सेवा (निवृत्तिवेतन) नियम, १९८२ आणि महाराष्ट्र नागरी सेवा (निवृत्तिवेतनाचे अंशराशीकरण) नियम, १९८४ मधील यासंबंधीच्या विद्यमान तरतुदींमध्ये स्वतंत्रपणे सुधारणा करण्यात येत आहे. महाराष्ट्र नागरी सेवा (निवृत्तिवेतन) नियम, १९८२ आणि महाराष्ट्र नागरी सेवा (निवृत्तिवेतनाचे अंशराशीकरण)**

**नियम, १९८४ मधील ज्या तरतुदींमध्ये या आदेशान्वये स्पष्टपणे सुधारणा करण्यात आलेल्या नाहीत त्या अबाधित राहतील.**

१५. शासन असाही आदेश देत आहे की, ज्यांना निवृत्तिवेतन योजना लागू केलेली आहे अशा मान्यता व अनुदानप्राप्त शैक्षणिक संस्था, कृषित्तरे विद्यापीठे व त्यांच्याशी संलग्न असलेली अशासकीय महाविद्यालये व कृषि विद्यापीठे यामधील निवृत्तिवेतनधारक यांना वरील निर्णय, योग्य त्या फेरफारासह लागू राहतील.

१६. महाराष्ट्र जिल्हा परिषदा व पंचायत समिती अधिनियम १९६१ (सन १९६२ चा महाराष्ट्र अधिनियम क्रमांक पाच) च्या कलम २४८ च्या परंतुकान्वये प्रदान केलेले अधिकार आणि त्यासंबंधीचे इतर सर्व अधिकार याचा वापर करुन शासन असाही आदेश देत आहे की, वरील निर्णय जिल्हा परिषदांचे निवृत्तिवेतनधारक यांनाही लागू राहतील.

१७. यासंबंधीचा खर्च वरील परिच्छेदात नमूद केलेल्या निवृत्तिवेतनधारकांचे निवृत्तिवेतन ज्या अर्थसंकल्पीय शिर्षाखाली खर्ची टाकण्यात येतो त्या शिर्षाखाली खर्ची टाकण्यात यावा व तो त्या त्या शिर्षांतर्गत मंजूर अनुदानातून भागविण्यात यावा. तथापि, आवश्यक असल्यास संबंधित मंत्रालयीन प्रशासकीय विभागांनी वरील निवृत्तिवेतनधारकांसबंधीचा खर्च भागविण्यासाठी विधीमंडळाच्या येत्या अधिवेशनात पूरक मागणी सादर करण्यासाठी आवश्यक ती कार्यवाही करावी.

१८. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या **www.maharashtra.gov.in** या वेब साईटवर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २००९१०३०१६३१०७००१ असा आहे.

१९. सदर शासन निर्णयाची इंग्रजी प्रत सोबत जोडली आहे. वरिल परिच्छेदांमध्ये नमूद केलेली जोडपत्र-१, २, ३ व ४ ही, इंग्रजी प्रतीसोबत जोडल्याप्रमाणे असतील.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

**निलेश बा. वाडेकर**
**शासनाचे उप सचिव**

एच-१८१५-४अ

प्रति,

महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता)-१, महाराष्ट्र, मुंबई (१००० प्रती).
महालेखापाल (लेखापरीक्षा)-१, महाराष्ट्र, मुंबई (५ प्रती).
संचालक, लेखा व कोषागारे, मुंबई (५ प्रती).
अधिदान व लेखा अधिकारी, वांद्रे, मुंबई (२५ प्रती).
संचालक, माहिती व जनसंपर्क विभाग, मंत्रालय, मुंबई.(१० प्रती)
मुख्य लेखा परीक्षक, स्थानिक निधी लेखा, कोकण भवन, वाशी, नवी मुंबई (१० प्रती).
उप-मुख्य लेखा परीक्षक, स्थानिक निधी लेखा,
मुंबई/पुणे/नागपूर/औरंगाबाद/नाशिक/अमरावती (प्रत्येकी १०प्रती).
वरिष्ठ कोषागार अधिकारी, पुणे/नागपूर/ औरंगाबाद/ नाशिक (प्रत्येकी १५ प्रती).
निवासी लेखापरीक्षा अधिकारी, मुंबई (५ प्रती).
सर्व जिल्हा कोषागार अधिकारी (प्रत्येकी १० प्रती).
सर्व विधानमंडळ सदस्य, विधानभवन, मुंबई
राज्यपालांचे सचिव,
मुख्य मंत्र्यांचे सचिव,
उप मुख्य मंत्र्यांचे सचिव,
सर्व मंत्री व राज्य मंत्री यांचे खाजगी सचिव,
*विशेष आयुक्त, महाराष्ट्र सदन, कोपर्निकस रोड, नवी दिल्ली.
*प्रबंधक,, उच्च न्यायालय (मूळ न्याय शाखा) मुंबई.
*प्रबंधक, उच्च न्यायालय, (अपील शाखा),मुंबई.
*सचिव, महाराष्ट्र लोकसेवा आयोग, मुंबई.
*सचिव, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, मुंबई.
*प्रबंधक, लोक आयुक्त व उप लोक आयुक्त यांचे कार्यालय, मुंबई.
*प्रबंधक, महाराष्ट्र प्रशासकीय न्यायाधिकरण मुंबई/नागपूर/औरंगाबाद
मुख्य माहिती आयुक्त, महाराष्ट्र, मुंबई.
आयुक्त, राज्य माहिती आयोग (सर्व)
सचिव, राज्य निवडणूक आयोग, नवीन प्रशासकीय भवन, १ला मजला, मंत्रालयासमोर, मुंबई ४०० ०३२
सचिव, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, मुंबई
ग्रंथपाल, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय ग्रंथालय, सहावा मजला, विधान भवन, मुंबई - ४०० ०३२.
मंत्रालयातील सर्व विभाग.
महालेखापाल(लेखा व अनुज्ञेयता)-२, महाराष्ट्र, नागपूर (१००० प्रती).
महालेखापाल (लेखापरीक्षा)-२, महाराष्ट्र, नागपूर (५प्रती).
मंत्रालयाच्या निरनिराळ्या विभागांच्या अधीन असलेल्या सर्व विभागांचे व कार्यालयांचे प्रमुख.
सर्व विभागीय आयुक्त (प्रत्येकी ५ प्रती).
सर्व जिल्हा परिषदांचे मुख्य कार्यकारी अधिकारी (प्रत्येकी २५ प्रती).
सर्व जिल्हा परिषदांचे अध्यक्ष
सर्व जिल्हा परिषदांचे मुख्य लेखा व वित्त अधिकारी (प्रत्येकी २५ प्रती).
शिक्षण संचालक, महाराष्ट्र राज्य, पुणे (१० प्रती).
तंत्र शिक्षण संचालक, महाराष्ट्र राज्य, मुंबई (५ प्रती).
सर्व जिल्हयांचे वरिष्ठ लेखा परीक्षक (शिक्षण) (प्रत्येकी ५ प्रती).
संचालक, महानगरपालिका प्रशासन, मुंबई (५ प्रती).
सर्व विभागीय शिक्षण उप संचालक (प्रत्येकी ३ प्रती).
सर्व विभागीय तंत्र शिक्षण उप संचालक (प्रत्येकी ३ प्रती).
शिक्षण निरीक्षक, बृहन्मुंबई, दक्षिण/उत्तर/पश्चिम,
सर्व प्रशासन अधिकारी, नगरपालिका शिक्षण मंडळ (प्रत्येकी ५ प्रती).
सर्व महानगरपालिका व नगरपरिषदा, महाराष्ट्र राज्य (प्रत्येकी ५ प्रती).
सर्व जिल्हयांचे वरिष्ठ लेखा परीक्षक (शिक्षण) (प्रत्येकी ५ प्रती).
कुल सचिव, महात्मा फुले कृषि विद्यापीठ, राहुरी, जिल्हा अहमदनगर (१० प्रती).
कुल सचिव, मराठवाडा कृषि विद्यापीठ , परभणी (१० प्रती).
कुल सचिव, पंजाबराव कृषि विद्यापीठ, अकोला (१० प्रती).
कुल सचिव, कोकण कृषि विद्यापीठ, दापोली, जिल्हा रत्नागिरी (१० प्रती).
कुलसचिव, डॉ.बाबासाहेब आंबेडकर तंत्रज्ञान विद्यापीठ, लोणेरे, जिल्हा रायगड (१० प्रती).
ग्रामविकास व जलसंधारण विभाग, मंत्रालय, मुंबई (१२ प्रती).
शालेय शिक्षण विभाग, मंत्रालय, मुंबई (२५ प्रती).
उच्च व तंत्र शिक्षण आणि सेवायोजन विभाग, मंत्रालय, मुंबई (२५ प्रती).
कृषि व पशुसंवर्धन, दुग्ध व्यवसाय विकास व मत्स्य व्यवसाय विभाग, मंत्रालय, मुंबई (१० प्रती).
वित्त विभागातील सर्व कार्यासने.
निवड नस्ती, कार्यासन सेवा-४.

---

*पत्राद्वारे.

एच-१८१५[१००००+४०-१०-०९]-५

Modifications in the Maharashtra Civil Services (Pension) Rules, 1982
Revision of Pension/Family Pension of post 1st January, 2006 Pensioners/Family Pensioners. .

**GOVERNMENT OF MAHARASHTRA**
**FINANCE DEPARTMENT**
Resolution No.PEN 1009/C.R.33/SER-4
Mantralaya, Mumbai 400 032 dated 30th October,2009

**Ref :** 1) Government Resolution, Finance Department, No.PEN 1008/CR 99/SER-4, dated 27th October, 2008
2) Government Resolution, Finance Department, No.Vepur 1209/CR 20/SER-9 ,dated 27th February, 2009
3) Government Resolution, Finance Department, No. PEN 1009/CR 29/SER-4, dated 5th May 2009
4) Government Corrigendum, Finance Department, No. PEN 1009/CR 29/SER-4,dated 22nd June 2009
5) Government Resolution, Finance Department, No. PEN 1009/CR 33/SER-4, dated 22nd June 2009
6) Government Corrigendum, Finance Department, No. PEN 1009/CR 29/SER-4, dated 7th July 2009

## Resolution

In view of the recommendations of sixth pay commission of Central Government, State Government has set up the "State Pay Revision Committee,2008" under the Chairmanship of Shri.P.M.A.Hakim to revise the pension of State Government pensioners. As per the recommendations of this committee Govt. vide GR dated 27th Feb.2009 referred to above at sr.no.2 has decided to revise the pension/family pension of the pensioners/family pensioners. Government is decided to supress orders issued accodingly vide Government Resolution, Finance Department No: PEN 1009/CR 33/SER-4, dated 22nd June 2009 referred to above at sr.no.5, and is pleased to introduce the following modifications as per the recommendation of the committee in the rules regarding Pension, Retirement/Death Gratuity, and Family Pension under the Maharashtra Civil Services (Pension) Rules, 1982 and commutation of pension under Maharashtra Civil Services (Commutation of Pension) Rules, 1984 which will apply to State Government employees and others governed by the above rules.

**Date of Effect :**

**2.** The revised provisions as per these orders shall apply to State Government servants who retire/die in harness on or after 1st January, 2006. Separate orders have been issued in respect of employees who retired before 1st January 2006 under Government Resolution dated 5th May 2009 referred to above at sr.no.3.

3. Where Pension/Family Pension/Gratuity/Commutation of Pension has already been authorised or yet to be authorised in cases of retirement/death occurring on or after 1st January 2006, the same shall be revised in terms of these orders. However, in cases where pension has been finally authorised on

pre-revised orders and if it happens to be more beneficial than the pension becoming due under these orders, the pension already authorised shall not be revised to the disadvantage of the pensioners in view of rule 131 of the Maharashtra Civil Services (Pension) Rules, 1982.

**Pay :**

**4.** The term " Basic Pay" in the revised pay structure means the pay drawn in the prescribed pay band plus applicable grade pay but does not include any other type of pay like special pay, which the Government servant was receiving immediately before his retirement or on the date of his death, for purposes of calculating various pensionary benefits,.

**Pension :**

5 A Government Servant retiring in accordance with the provisions of the Maharashtra Civil Services (Pension) Rules, 1982, before completing qualifying service of ten years shall not be entitled to pension but he shall continue to be entitled to service gratuity in terms of Rule 110(1) of the Maharashtra Civil Services (Pension) Rules, 1982. Retiring benefits to the Government servant in such cases are explained in **Annexure I**.

**5.1** In cases where Government servant retiring from 27th February, 2009 (the date from which recommendations of Hakim Committee has been accepted) on superannuation, retiring invalid or compensation pension in accordance with the provisions of Rule 110(2) (b) of the Maharashtra Civil Services (Pension) Rules, 1982, after completing qualifying service of ten years or more but less than twenty years, pension shall be paid at 50% of the last basic pay or 50% of average basic pay received during the last 10 months, whichever is more beneficial to him. Therefore Rule 110(2) (b) of the Maharashtra Civil Services (Pension) Rules, 1982 is deleted from 27th February, 2009. Retiring benefits to the Government servant in such cases are explained in **Annexure II.** Accordingly, Rule 110 (2)(b) of the Maharashtra Civil Services (Pension) Rules, 1982 shall stand modified to this extent.

**5.2** Linkage of full pension with 33 years qualifying service as per Rule 110(2) (a) of Maharashtra Civil Services (Pension) Rules, 1982 is dispensed with from 27th February, 2009 (the date from which recommendations of Hakim Committee has been accepted). Once a Government Servant has rendered the minimum qualifying service of twenty years, pension shall be paid at 50% of the last basic pay or 50% of average basic pay received during the last 10 months, whichever is more beneficial to him. Therefore Rule 110(2) (a) of the Maharashtra Civil Services (Pension) Rules, 1982 is deleted from 27th February, 2009. Retiring benefits to the Government servant in such cases are explained in **Annexure III.** Accordingly, Rule 110 (2)(a) of the Maharashtra Civil Services (Pension) Rules, 1982 shall stand modified to this extent.

**5.3** ~~As minimum qualifying service~~ from 27th February,2009 will be of 20 years, the provision of addition to qualifying service of Rule 66,(A) of the Maharashtra Civil Services (Pension) Rules, 1982 is deleted from 27th February, 2009. Rule 66(A) of the Maharashtra Civil Services (Pension) Rules, 1982, shall stand modified to this extent.

**5.4** The provisions in para 5.1, 5.2 and 5.3 above shall come into force with effect from 27th February,2009 and shall be applicable to Government Servants retiring on or after that date. The government servant servants who have retired on or after 1st January, 2006 but before 27th February, 2009 will continue to be governed by the Rules/orders which were in force immediately before coming into effect of these orders.

**5.5** The pensionable pay based on the basic pay of the preceding 10 months of those Government Servants who have opted to come over the revised scales of pay and had retired within a period of 10 months reckoned from 1st January, 2006 shall be calculated as follows :-

**A) For the period during which pay was drawn in the revised pay scales :-**

The aggregate of the basic pay for the number of months for which pay was drawn in the revised pay scales.

**AND**

**B) For the period during which pay was drawn in the pre-revised pay scales :-**

The total pay for the number of months for which pay was drawn in the pre-revised pay scales shall be calculated after taking into account the following :

1) Basic Pay ( including increments, if any. drawn during the intervening period) + dearness pay + actual D.A. appropriate to the basic pay at the rates in force on 1st January, 2006 drawn during the relevant period.

2) Notional increase of the basic pay by applying the fitment benefit of 40% on the basic pay in the pre-revised pay scale.

The pensionable pay of the preceding ten months will thereafter be calculated by adding (A) & (B) and dividing the result by ten. Pension will be worked out as per rules in force at the time of retirement.

**5.6** Pension shall be subject to a maximum of upto 50% of highest pay admissible in the State Government (highest pay is Rs.67,000/- + grade pay eligible to the post since 1st January, 2006).

**Retirement Gratuity/Death Gratuity :**

**6.** Retirement /Death Gratuity shall be calculated on the basic pay as mentioned in para 4 of this Government Resolution. A Government Servant who has retired on or after 1st January, 2009 to 31st August, 2009 will be eligible for retirement gratuity equal to one-forth of his pay for each completed six monthly period qualifying service, subject to a maximum of 16 and1/2 times the pay or Rupees Five lakhs whichever is less. A Government Servant who has retired from on or after 1st September, 2009 will be eligible for retirement gratuity equal to one-forth of his pay for each completed six monthly period qualifying service.( maximum of 16 and1/2 times the pay ) or Rupees Seven lakhs whichever is less.

**6.1** If a Government Servant dies upto 31st August, 2009 while in service , the death-gratuity shall be paid to his family as per the rates mentioned in Rule 111(2) of the Maharashtra Civil Services (Pension)

Rules, 1982 or maximum of Rupees Five lakhs whichever is less. If a Government Servant dies on or after 1st September, 2009 while in service, the death-gratuity shall be paid to his family as per the rates mentioned in Rule 111(2) of the Maharashtra Civil Services (Pension) Rules, 1982 or maximum of Rupees Seven lakhs whichever is less.

**Family Pension, 1964 :**

**7.** Family Pension shall be calculated at a uniform rate of 30% of Basic pay in all cases. Pension shall be subject to a maximum of upto 30% of highest pay admissible in the State Government (which is Rs.67,000/- + grade pay eligible to the post since 1st January, 2006).

**7.1** From 1st January, 2006, the enhanced family pension under Rule 116 (4) (a) (i) of the Maharashtra Civil Services (Pension) Rules, 1982 shall be payable to the family of a Government servant who dies in service from the date of death of the Government servant for a period of ten years. The condition of age limit is deleted. Accordingly, Rule 116 (4)(a)(i) of the Maharashtra Civil Services (Pension) Rules, 1982 shall stand modified to this extent.

**7.2** There is no change in Rule 116 (4)(a)(ii) of the Maharashtra Civil Services (Pension) Rules, 1982 regarding the period for payment of enhanced family pension to the family in the case of death of pensioner.

**Commutation of Pension :**

**8.** According to Rule 5(1) of Maharashtra Civil Services (Commutation of Pension) Rules, 1984, a Government servant shall be entitled to commute for a lumpsum payment a fraction not exceeding 40% of his pension as per revised rates mentioned in Annex.IV. Accordingly, Rule 5(1) of the Maharashtra Civil Services (Commutation of Pension) Rules, 1984 and existing Table of Commutation value for Pension shall stand modified to this extent

**8.1** Rule 5(1) of Maharashtra Civil Services (Commutation of Pension) Rules, 1984 and existing Table of Commutation value for Pension has been changed and this rule and existing table will not be in existence henceforth. The revised Rule and table will become absolute after 27th February, 2009. In all cases where the date of retirement/commutation of pension is on or after this date, the revised table of Commutation Value for pension will be used for all commutations of pension. The formula of commutation is as follows :

**Basic Pension x 40% x 12 x commutation value at age next birthday based on the date of original application of Government Servant as per revised (Annex.IV) table.**

**8.2** In the case of those pensioners, who have retired on or before 27th February, 2009, will be eligible for payment of commutation of pension based on pre-revised pay/pension as per pre-revised rates of commutation value. Such pensioners shall have following two options to commute the amount of pension that has become additionally commutable on account of retrospective revision of pay/pension. The option once exercised is final.

a) Without commuting the additional amount as per revised table of commutation value the pensioner can opt for revised basic pension minus commuted amount of unrevised pension.

**OR**

b) The pensioner can opt for 1/3 commutation of enhanced basic pension ( revised basic pension minus unrevised basic pension) as per revised table of commutation value. The pensioner will be eligible for commuted value at the time of exercising this option for his age next birthday based on the date of original application as per following formula :

**basic pension x 1/3 x 12 x commuted value for the age next birthday based on the date of original application of Government Servant as per revised (Annex.IV) commutation table.**

If the pensioner opts for option (b), he will get revised basic pension minus total commutation (commutation on unrevised pension + commutation on diffierence between revised and unrevised pension) as monthly pension. Also he will be eligible for arrears of revised basic pension minus originally commuted amount minus monthly pension from date of retirement till he gets the lumpsum amount of commuted value.

**8.3** The provisions in para 8 and 8.1 above shall come into force with effect from 27th February,2009 and shall be applicable to Government Servants retiring on or after that date. The government servant servants who have retired on or after 1st January, 2006 but before 27th February, 2009 will continue to be governed by the Rules/orders which were in force immediately before coming into effect of these orders.

**8.4** The decuction of revised part of commutation from the amount of monthly pension shall be operative from the date of actual payment of the arrears of committed value of revised pension. It is obligatory to the Head of Department/Office to communicate these deatails to concern Treasury Officers.

**8.5** While restoring the committed part of revised pension after 15 years, as per provisions of Government Resolution, Finance Department, No.COP-1086/1771/SER-4 dated 30th May,1988, the committed part will be restored after 15 years from the date of deduction from monthly pension.

**Dearness Relief** :

**9.** The pensioners/family pensioner will get dearness relief as per the rates mentioned below on the Pension/Family Pension eligible as per this resolution :

| Sr.No. | Period | Monthly rates of Dearness Relief |
|---|---|---|
| 1 | From 1st January 2006 to 30th June, 2006 | 0 |
| 2 | From 1st July 2006 to 31st December, 2006 | 2% |
| 3 | From 1st January 2007 to 30th June, 2007 | 6% |
| 4 | From 1st July 2007 to 31st December, 2007 | 9% |
| 5 | From 1st January 2008 to 30th June, 2008 | 12% |
| 6 | From 1st July 2008 to 31st December, 2008 | 16% |

The orders of 22% dearness relief on revised pension/family pension w.e.f. 1st January, 2009 and 27% w.e.f. 1st July, 2009 to the pesioners/family pensioners had been issued vide Government Resolution, Finance Department, No.DRP-1009/35/SER-4 dated 5th May, 2009 and

Government Resolution, Finance Department, No.DRP-1009/CR 83/SER-4 dated 7th October, 2009 respectively.

10. Pension/family pension in the revised pay structure is payable in cash from 1st day of April, 2009. The amount of arrears admissible for the period from 1st day of January, 2006 to 31st March. 2009 will be payable in cash in five equal installments over a period of five years after adjusting the amount of advance sanctioned vide Government Resolution No.PEN 1008/CR 99/SER-4 dated 27/10/2008 in the first installment. The arrears of first installment if any should be paid till December, 2009. Remaining amount of arrears should be paid in the month of June every year.

10.1 The difference of amount of commutation and gratuity due to revision of pension sholuld be paid in cash in one instalment.

11. **In cases of State Government Servants who retire/die-in-harness on or after 1st January,2006, the usual procedure for determination and authorisation of pensionary benefits as laid down in the Maharashtra Civil Services (Pension) Rules, 1982 and Maharashtra Civil Services (Commutation of Pension) Rules, 1984 should be followed.**

12. The pensioners/family pensioners who are getting provisional pension/family pension on unrevised pay as per Rule 126, 130, and 140 (4)(a)(2) of the Maharashtra Civil Services (Pension) Rules, 1982 should be revised provisionally as per these orders.

13. Legal heir(s) of pensioner/family pensioner is/are entitled for life time arrears with effect from 1st January, 2006 tilll the death of pensioner/family pensioner. For this purpose legal heir(s) of pensioner/family pensioner may also apply to Head of Department/Office from which the Government servant have retired or was working last before his death.

14. **Formal amendments to the Maharashtra Civil Services (Pension) Rules, 1982 and Maharashtra Civil Services (Commutation of Pension) Rules, 1984 in terms of the decisions contained in this order will be issued separately. Provisions of the Maharashtra Civil Services (Pension) Rules, 1982 and Maharashtra Civil Services (Commutation of Pension) Rules, 1984 which are not specifically modified by these orders will remain unaffected.**

15. Government is also pleased to direct that the above decision should, mutatis mutandis apply to those Pensioners of Recognised and Aided Educational Institutions, Non-Agricultural Universities and affiliated Non-Government Colleges and Agricultural Universities etc., to whom the pension scheme is made applicable

16. In exercise of the powers conferred by the proviso to Section 248 of the Maharashtra Zilla Parishadas and Panchayat Samiti's Act 1961 (Mah.V of 1962) and of all the other powers enabling it

in that behalf, Government is further pleased to decide that the above decisions apply to the pensioners of Zilla Parishadas.

**17.** The expenditure on this account should be debited to the Budget Heads to which the Pensions of the Pensioners mentioned in the above paras are debited and should be met from the grants sanctioned thereunder. However, if necessary, concerned Administrative Departments of Mantralaya should take necessary steps to present Supplementary Demands in the ensuing session of the Legislature to cover expenditure to be incurred in respect of aforesaid Pensioners.

**18.** This Government Resolution is available on the web site of Government of Maharashtra i.e.-"**www.maharashtra.gov.in**" and its computer code number is 20091030163107001.

By order and in the name of the Governor of Maharashtra,

NBWadekar

**Nilesh B. Wadekar**
**Deputy Secretary to Government**

**(For post-2006 pensioners)**

## ANNEXURE -I

**(As referred in paragraph 5 of Government Resolution, Finance Department, No. PEN 1099/ CR 33/SER-4 dated 30th October,2009)**

**A government servant retiring on Superannuation, retiring invalid or compensation pension before qualifying service of 10 years, will be eligible for following service benefit**

| M.C.S. (Pension) Ruls 1982 | Length of service | Pension | Pro-rate service gratuity | Retirement Gratuity |
|---|---|---|---|---|
| Rule 110 (1) & Rule 111 (1) | Less than 10 years | not eligible for pension | at the rate of half month's basic pay of every completed six monthly period of qualifying service | at the rate of one forth of month's basic pay of every completed six monthly period of qualifying service |

(For post-2006 pensioners)

# ANNEXURE -II

(As referred in paragraph 5.1 of Government Resolution, Finance Department, No. PEN 1099/ CR 33/SER-4 dated 30th October,2009)

A government servant retiring on Superannuation, retiring invalid or compensation pension after completing qualifying service of 20 years or more will be eligible for following service benefits.

| M.C.S. (Pension) Ruls 1982 | Length of service | Pension | Pro-rate service gratuity | Retirement Gratuity |
|---|---|---|---|---|
| Rule 110 (1) & Rule 111 (1) | 20 years or more than 20 years | 50% of last basic pay or average basic received during last 10 months whichever is more beneficial. | Not eligible for service gratuity. | at the rate of one forth last month's basic pay of every completed six monthly period of qualifying service not exceeding sixteen and half month. |

(For post-2006 pensioners)

## ANNEXURE -III

(As referred in paragraph 5.3 of Government Resolution, Finance Department, No. PEN 1099/ CR 33/SER-4 dated 30th October,2009)

A government servant retiring on Superannuation, retiring invalid or compensation pension after completing qualifying service of ten years or more but less than twenty years, will be eligible for following service benefits.

| M.C.S. (Pension) Ruls 1982 | Length of service | Pension | Pro-rate service gratuity | Retirement Gratuity |
|---|---|---|---|---|
| Rule 110 (1) & Rule 111 (1) | 10 years or more but less than 20 years | 50% of last basic pay or average basic received during last 10 months whichever is more beneficial. | Not eligible for service gratuity. | at the rate of one forth of month's basic pay of every completed six monthly period of qualifying service |

(For post-2006 pensioners)

## Annexure-IV

(As referred in paragraph 8.1 amd 8.2 of Government Resolution, Finance Department, No. PEN 1099/ CR 33/SER-4 dated 30th October,2009)

COMMUTATION VALUE FOR A PENSION OF Re.1 PER ANNUM

| Age next birthday | Commutation Value expressed as number of year's purchase | Age next birthday | Commutation Value expressed as number of year's purchase | Age next birthday | Commutation Value expressed as number of year's purchase |
|---|---|---|---|---|---|
| 20 | 9.19 | 41 | 9.075 | 62 | 8.093 |
| 21 | 9.187 | 42 | 9.059 | 63 | 7.982 |
| 22 | 9.186 | 43 | 9.040 | 64 | 7.862 |
| 23 | 9.185 | 44 | 9.019 | 65 | 7.731 |
| 24 | 9.184 | 45 | 8.996 | 66 | 7.591 |
| 25 | 9.183 | 46 | 8.971 | 67 | 7.431 |
| 26 | 9.182 | 47 | 8.943 | 68 | 7.262 |
| 27 | 9.180 | 48 | 8.913 | 69 | 7.083 |
| 28 | 9.178 | 49 | 8.881 | 70 | 6.897 |
| 29 | 9.176 | 50 | 8.846 | 71 | 6.703 |
| 30 | 9.173 | 51 | 8.808 | 72 | 6.502 |
| 31 | 9.169 | 52 | 8.708 | 73 | 6.296 |
| 32 | 9.164 | 53 | 8.724 | 74 | 6.085 |
| 33 | 9.159 | 54 | 8.678 | 75 | 5.872 |
| 34 | 9.152 | 55 | 8.627 | 76 | 5.057 |
| 35 | 9.145 | 56 | 8.572 | 77 | 5.443 |
| 36 | 9.136 | 57 | 8.512 | 78 | 5.229 |
| 37 | 9.126 | 58 | 8.446 | 79 | 5.018 |
| 38 | 9.116 | 59 | 8.371 | 80 | 4.812 |
| 39 | 9.103 | 60 | 8.287 | 81 | 4.611 |
| 40 | 9.090 | 61 | 8.194 | | |